**केळझर मध्यम प्रकल्प, ता. बागलाण (सटाणा), जि. नाशिक या प्रकल्पांतर्गत डावा कालवा कि.मी ० ते १२ मध्ये आर.सी.सी बंदिस्त पाईप लाईन टाकणे व भराव मजबूतीकरण करणे विशेष दुरूस्ती कामास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/ (प्र.क्र.५४०/२०१७)/ सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ११/०९/२०१८

**वाचा :-** १. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र. गोमपाविम/सिंचन-१/धा.क्र.१९,३०/७५३८, दि.१६/०८/२०१८.
२. शासन निर्णय - संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२ , दि.२६.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

तापी खोऱ्यातील आरम नदीवर नाशिक जिल्ह्यातील सटाणा शहरापासून पश्चिमेस ३५ कि.मी. अंतरावर तताणी गावाजवळ केळझर मध्यम प्रकल्प बांधण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पाचे काम सन १९७२ मध्ये सुरु करुन सन १९८५ मध्ये पूर्ण करण्यात आलेले आहे. सदर प्रकल्प १९८५ पासून बांधकाम विभागाकडे होता, परंतु त्याच्यांमार्फत सिंचन व्यवस्थापन करण्यात येत होते. सदर प्रकल्पास पाणलोट क्षेत्र ५४.३९ चौ.कि.मी. आहे. पाण्याची एकूण आवक १९.८२ दलघमी असून प्रस्तावित पाणी वापर १९.८२ दलघमी इतका आहे. धरणाचा एकूण साठा १७.१०दलघमी असून उपयुक्त साठा १६.२२ दलघमी इतका आहे. केळझर डावा कालवा लांबी २ कि.मी. वहन क्षमता ८० घ.फूट प्रति सेंकद व त्यावरील सिंचन क्षेत्र २६०४ हेक्टर इतके आहे. केळझर प्रकल्पावर डाव्या कालव्यावर २६०४ हेक्टर जलाशय उपसा ५८ हेक्टर आरम नदीवरील ७ बंधाऱ्याचे ७३२ हेक्टर असे एकूण ३३९४ हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली येते. सदर प्रकल्प १९९१ पासून सिंचन विभागाकडे व्यवस्थापनेसाठी वर्ग झालेला आहे. केळझर मध्यम प्रकल्प, ता.सटाणा, जि. नाशिक डावा कालवा केळझर धरणापासून थेट २० कि.मी. लांबीचा डावा कालवा आहे. सदरचा कालवा संरेखा डोंगर पायथ्याशी असल्याने डोंगरावरुन वाहून येणाऱ्या पावसाच्या पाण्यामुळे कालव्यात मोठ्या प्रमाणात माती,दगड-गोटे वाहून येत असल्याने कालव्याचे नुकसान होत असते व डावा कालवा किमी ४ ते ११ मधील भागातून मोठ्या प्रमाणात नाश होतो. सदर गळती बंद होण्यासाठी आवश्यक ती गळती प्रतिबंध म्हणून बंदिस्त आर.सी.सी पाईपलाईन करण्याचे प्रस्तावित आहे व तसेच कालव्यावरील भराव मजबूती व दुरुस्ती करण्याचे नियोजन आहे.सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापरसंस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. या अनुषंगाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

केळझर मध्यम प्रकल्प, ता. बागलाण (सटाणा), जि. नाशिक या प्रकल्पांतर्गत मुख्य डावा कालवा कि.मी.० ते १२ मध्ये आर.सी.सी बंदिस्त पाईप लाईन टाकण्याच्या विशेष दुरूस्ती कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत रु.३,५८,८७,७६४/-, ३% अनुषंगिक खर्च रु.१०,७६,६३३/- , १% W.C. रु.३,५८,८७८/- , १२% GST excluding cost of Royalty रु. ३७,९८,२५०/- अशा एकूण रु.४,११,२१,५२५/- (रू.चार कोटी, अकरा लक्ष, एकवीस हजार, पाचशे पंचवीस फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या आधिकारान्वये व आं.वि.स. व उ.स. यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन परिपत्रक क्र. सिंचन -२०१५/प्र.क्र.२४/(भाग-२)/२०१५/जसं (धोरण), दि.०२/०२/२०१७ मधील मागदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी.

३. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार २ % मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. सदर कामास प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर सविस्तर संकल्पन करुनच तांत्रिक मान्यता देण्यात यावेत, तसेच प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच्या आत अंदाजपत्रकाची किंमत राहावी व याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

७. माती कामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

८. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/ तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

९. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

१०. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करुन द्यावे.

११. विषयांकित अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर व तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१२) उर्वरित महाराष्ट्र, (१२) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १९४) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ मध्ये विहित केल्यानुसार कामांच्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार आं.वि.स व उ.स. यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २२ सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in **या** संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१८०९१२१५१५२८९७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.09.12 15:37:45 +05'30'

**( अ.अ. कपोले )**
शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१४) मुख्यअभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक,
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक,
१७) कार्यकारी अभियंता, मालेगांव पाटबंधारे विभाग, नाशिक,
१८) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/(प्र.क्र. ५४० /२०१७)/ सिं.व्य.(कामे), दि. ११ /०९ /२०१८ चे सहपत्र

| **Sr.No.** | **Item Of Work** | **Estimate Cost** |
|---|---|---|
| **1** | **2** | 3 |
| 1 | Sub Estimate No.1 - Providing & laying R.C.C. 1800 mm & NP 3 class for K.L.B.C. ch. 3980 m to 4485 m & ch. 5565 m to 6455 m | 2,20,91,338 |
| 2 | Item No.2 Providing & laying R.C.C. 1600 mm & NP3 class for K.L.B.C. ch. 8162 m to 8340 m & ch. 9150 m to 9570 m | 71,32,189 |
| 3 | Item No.3 Repairs to embankment of K.L.B.C. km 1 to 12 | 66,64,237 |
| | **Total Rs.** | 3,58,87,764 |
| | **Say Rs.** | |
| | **Add 3 % Contingency** | **10,76,633** |
| | **Add 1 % W.C.** | **35,88,78** |
| | **Add 12 % for GST (Excluding cost of Royalty) (3,58,87,758 – 42,35,678= 3,16,52,080)** | **37,98,250** |
| | **Total** | **4,11,21,525** |

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.09.12 15:39:18 +05'30'

(अ.अ.कपोले)
शासनाचे उप सचिव